महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री कै.वसंतराव नाईक यांची जयंती राज्यात दि.१ जुलै, २०२० रोजी कृषि दिन म्हणून साजरा करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक:कृषिदि- ०५२० /प्र.क्र.८० /३अे
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २२ जून, २०२०

संदर्भ:-

१) कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण-१०८९ /प्र.क्र.३८/१२ अे, दि.२१ जून,१९८९.
२) कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र. कृषिवि-३८०९/प्र.क्र.१२३/३अे, दि.१२ जून,२००९.
३) कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र. कृषिवि-३८११/प्र.क्र.१२७/३अे, दि.२२ जून,२०११.
४) संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र क्र.शेमासे/कृषिदिन/ दि.१ जुलै/१२४५६/२०, दि.०४/०५/२०२०
५) मा. मंत्री (कृषि) यांचे दि. १६/०६/२०२० चे पत्र

प्रस्तावना:

महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री कै. वसंतराव नाईक यांनी कृषि क्षेत्रात केलेली भरीव कामगिरी लक्षात घेवून त्यांची जयंती दि.१ जुलै रोजी राज्यात कृषि दिन म्हणून साजरी करण्याचा निर्णय शासनाने संदर्भाधीन दि.२१ जून,१९८९ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेतला आहे.

खरीप हंगाम-२०२० चा पेरणी काळ सुरू झाला आहे. कोव्हीड-१९ च्या पार्श्वभूमीवर लॉकडाऊन असतांना कृषि विभाग, कृषि विद्यापिठ यांनी तंत्रज्ञान प्रसारासाठी Online Platform चा वापर करून शेतकऱ्यांपर्यंत तंत्रज्ञान पोहचविण्याचा प्रयत्न केला आहे. भविष्यात देखील ही गरज असणार आहे. हे विचारात घेऊन यापुढे नियोजन करणे आवश्यक आहे.बांधावर खते व बियाणे पुरवठा हे काम कृषि विभागाने चांगल्या पध्दतीने पार पाडले आहे. त्यास शेतकऱ्यांनी देखील मोठ्या प्रमाणावर प्रतिसाद दिला आहे.

शासन निर्णय:-

१. दि.१ जुलै, २०२० रोजी राज्यात प्रतीवर्षीप्रमाणे कृषि दिन म्हणून साजरा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. कृषि दिनानिमित्त प्रत्येक पंचायत समितीकरीता जास्तीत जास्त रु.५०००/- (रु.पाच हजार फ़क्त ) यानुसार ३५५ पंचायत समित्यांकरिता रु.१७,७५,०००/- (रु.सतरा लाख पंच्च्याहत्तर हजार फ़क्त) तसेच जिल्हा परिषद मुख्यालयी कृषिदिन साजरा करण्यासाठी प्रत्येक जिल्हा परिषदेकरीता रु.१०,०००/- (रु. दहा हजार फ़क्त) या प्रमाणे एकूण ३४ जिल्हा परिषदांकरीता रु.३,४०,०००/-( तीन लाख चाळीस हजार फ़क्त) अशा एकूण रु.२१,१५,०००/- (रुपये एकवीस लाख पंधरा हजार फ़क्त ) एवढया खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. कृषि दिन साजरा करण्याबाबत मार्गदर्शक सूचना आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संबंधितांना द्याव्यात. कृषि आयुक्तांनी दिलेल्या मार्गदर्शक सूचनांतील बाबीवर सदर खर्च करण्यात यावा.

३. या प्रित्यर्थ येणारा खर्च जिल्हा परिषद सेस फंडातील उपलब्ध असलेल्या अनुदानातून करण्यात यावा. हा खर्च भागविण्याकरिता सर्व जिल्हयातील मुख्य कार्यकारी अधिकारी व कृषि अधिकारी यांनी जिल्हा सेस फंडातून खर्च करण्याकरीता आयुक्त (कृषि) यांनी दिलेल्या मार्गदर्शक सूचनेनुसार कार्यवाही करावी. या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीची जबाबदारी आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. खरीप २०२० चे पेरणी हंगामात राज्यातील कृषि विभागाचे क्षेत्रिय कर्मचारी/अधिकारी, कृषि विद्यापिठाचे शास्त्रज्ञ तसेच विस्तार यंत्रणा यांनी शेतकऱ्यांच्या बांधावर जाऊन शेतकऱ्यांना मार्गदर्शन करावे.तरी सर्व कृषि विद्यापिठे / कृषि विभागाची यंत्रणा यांनी या संदर्भात कृति आराखडा तयार करून त्याची अंमलबजावणी व समन्वयन करावे.

५. सन २०२०चा कृषिदिन (१ जुलै २०२०) मा. मंत्री (कृषि), कुलगुरू (कृषि विद्यापिठे), सचिव (कृषि), आयुक्त कृषि, प्रकल्प संचालक (पोकरा), महासंचालक (MCAER), तसेच कृषि विभागाचे सर्व क्षेत्रिय अधिकारी/ कर्मचारी , विद्यापिठ शास्त्रज्ञ , कृषि विद्यार्थी यांनी कोव्हीड-१९ च्या पार्श्वभूमीवर नियमांचे पालन करून शेतकऱ्यांच्या बांधावर जाऊन मार्गदर्शन करून साजरा करावा.

६. कोविड-१९ च्या पार्श्वभूमीवर जास्तीत जास्त Webinar संवाद/मार्गदर्शन वर्ग आयोजित करून दि. १ जुलै २०२० रोजी राज्यात कृषिदिन साजरा करण्याची कार्यवाही करावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६२२१४४६५२८८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.06.22 15:05:20 +05'30'

**( अशोक आत्राम )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
४. कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ,अकोला
६. व्यवस्थापकयीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई प्रसिध्दीच्या विनंतीसह (५ प्रती)

८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई, महाराष्ट्र -२ नागपूर.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई, महाराष्ट्र -२ नागपूर
१०.सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ / विधान मंडळ ग्रंथालय (१० प्रतीसह)
११.सर्व जिल्हाधिकारी
१२.सर्व जिल्हयाचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१३.सर्व विभागीय आयुक्त
१४.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१५.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.सर्व कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७.सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
१८. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१९.सर्व तालुका कृषि अधिकारी
२०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२१.निवडनस्ती (३ अे)